**सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०२२**
**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांपैकी विहित मुदतीत रूजू न झालेल्या उमेदवारांचे नियतवाटप रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**क्रमांक : एएससी १४२४/प्र.क्र. ३७/१४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्रमांक : ०२२-२२७९४१७२.
दिनांक : २७ मे, २०२४.

**वाचा:-** १) म.लो.आ. चे क्र. १४४२ (२) (१)/२०२२/तेवीस, दि. ३०.०१.२०२४ रोजीचे पत्र.
२) या विभागाचे समक्रमांकाचे दि. २३.०२.२०२४ चे ज्ञापन.
३) सा.प्र.वि., शासन परिपत्रक क्र. मलोआ १११९/प्र.क्र.११५/८, दि.०२.०८.२०१९.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र दुय्यम सेवा, अराजपत्रित गट-ब मुख्य परीक्षा-२०२२ या परीक्षेतील सहायक कक्ष अधिकारी संवर्गाच्या ४९ पदांसाठी दिनांक २२.१०.२०२३ रोजी घेण्यात आलेल्या मुख्य परिक्षेचा अंतिम निकाल दि. १८.०१.२०२४ रोजी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द केला आहे. सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा-२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक ३०.०१.२०२४ च्या पत्रान्वये शिफारस केलेल्या ४९ उमेदवारांचे या विभागाच्या संदर्भाधिन क्र. २ येथील दि. २३.०२.२०२४ च्या ज्ञापनान्वये मंत्रालयीन विभागात/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात आले होते. सदर ज्ञापनान्वये उमेदवारांना नियुक्तीचा स्विकार करण्यासाठी दि. २६.०३.२०२४ पर्यंत मुदत देण्यात आलेली होती.

२. संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. ०२.०८.२०१९ च्या शासन परिपत्रकानुसार नियुक्ती आदेशात नमूद केलेल्या ३० दिवसाच्या मुदतीत उमेदवार रूजू न झाल्यास किंवा विहित कालावधीत रूजू होण्यासाठी मुदतवाढ देण्याची विनंती न केल्यास किंवा विहित वाढीव कालावधीत उमेदवार रूजू न झाल्यास नियुक्ती प्राधिकारी यांनी संबंधित उमेदवाराची नियुक्ती रद्द करण्याचे आदेश निर्गमित करण्याची तरतूद करण्यात आलेली आहे.

३. दि. २३.०२.२०२४ च्या ज्ञापनान्वये नियवाटप करण्यात आलेल्या ४९ उमेदवारांपैकी १० उमेदवारांनी विहित कालावधीत नियुक्ती स्विकारली नाही.

४. सबब, संदर्भाधिन क्र. ३ येथील शासन परिपत्रकातील तरतुदीनुसार संदर्भाधिन क्र. २ येथील दि. २३.०२.२०२४ च्या ज्ञापनान्वये मंत्रालयीन विभागात/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात सहायक कक्ष अधिकारी पदावर नियतवाटप करण्यात आलेल्या उमेदवारांपैकी विहित कालावधीत रूजू न झालेल्या सोबतच्या विवरणपत्र "अ" मधील उमेदवारांचे नियतवाटप रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०५२७१७१८०९७००७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2024.05.27 17:31:48 +05'30'

**(वि. बा. माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-** संबंधित उमेदवार (सोबतच्या विवरणपत्र "अ" प्रमाणे) (ई मेल व्दारे)

**प्रत :-**

१) सह सचिव/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग.
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, प्लॉट नंबर ३४, सरोवर विहार समोर, सेक्टर ११, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई-४००६१४
३) सामान्य प्रशासन विभाग [कार्यासन (१४-अ)] (संग्रहार्थ)

# सरळसेवा सहायक कक्ष अधिकारी (मुख्य) परीक्षा २०२२ मधून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांपैकी विहित मुदतीत रूजू न झालेल्या उमेदवारांचे नियतवाटप रद्द करण्याबाबत.

## सामान्य प्रशासन विभाग, शासन ज्ञापन क्र.एएससी १४२४/प्र.क्र.३७/प्रशा-३ (१४-अ),

## दिनांक : २७ मे, २०२४ सोबतचे (विवरणपत्र "अ")

| अ.क्र. | म.लो.आ शिफारस क्रमांक | Name | उमेदवाराचा मुळ प्रवर्ग | म.लो.आ शिफारस प्रवर्ग | विभागाचे नाव |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 3 | SWAMI VAIBHAV VIRBHADRA | **OBC** | **OPEN-General-3** | सामान्य प्रशासन विभाग |
| 2 | 4 | GURAV VIJAY ASHOK | **OBC** | **OPEN-General-4** | जलसंपदा विभाग |
| 3 | 6 | GANESH LOKHANDE | **NT-C** | **OPEN-General-6** | गृह विभाग |
| 4 | 13 | UNDRE AMRUTA MAHADEO | **Unreserved** | **OPEN-Female-1** | जलसंपदा विभाग |
| 5 | 18 | PATIL ASHISH ASHOK | **OBC** | **OBC- General-4** | विधि व न्याय विभाग |
| 6 | 25 | kush arun puri | **NT-B** | **NT-B- General-1** | कृषि व पदुम विभाग |
| 7 | 31 | TAKALIKAR SUPRIYA SUBHASH | **Unreserved** | **OPEN-Female-4** | महाराष्ट्र लोकसेवा आयोग |
| 8 | 32 | WARHADE RADHA SHIVCHANDRA | **OBC** | **OPEN-Female-5** | वित्त विभाग |
| 9 | 34 | LOKHANDE AJAY VILAS | **SC** | **SC- General-1** | नियोजन विभाग |
| 10 | 36 | SARNAIK SNEHAL VINODRAO | **Unreserved** | **OPEN-Female-7** | सार्वजनिक आरोग्य विभाग |